**प्रशासकीय मान्यता**
शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती बांधकामासाठी नियुक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (पीएमसी) कंपनीस अदा करावयाचे सल्लागार शुल्क व इतर अनुषांगिक बाबींचे खर्च प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : जीसीबी-२०१८/प्र.क्र.३७७/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुगालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई.
दिनांक : ०९ जानेवारी, २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक जीएमबी - २०१३ / प्र.क्र. ११२ / प्रशा-१, दिनांक २०.०३.२०१३
२) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक संकीर्ण -२०१३ / प्र.क्र. २२५ / प्रशा-१, दिनांक २७.१२.२०१३
३) संचालनालयाचे पत्र क्र.संवैशिवसं / बैजीशावैम / बारामती / प्रकल्प सल्लागार शुल्क/ प (आय) /१९, दिनांक २५.११.२०१९
४) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.: ससमा-२०१०/प्र.क्र.४(भाग-१)/ का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८
५) कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे क्र.बैठक-२०१९/प्र.क्र.९७/इमा-१, दिनांक १९/१२/२०१९ च्या पत्रासह इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती संस्थेच्या बांधकामासाठी उपरोक्त शासन निर्णय, दिनांक २०.०३.२०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर बांधकामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने राबविलेल्या निविदा प्रक्रियेंती उपरोक्त शासन निर्णय, दिनांक २७.१२.२०१३ अन्वये प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची नियुक्ती करण्यात आली होती.

सदर प्रकल्प व्यवस्थापन सल्लागारचे शुल्क तसेच सदर प्रकल्पासाठी आलेल्या अनुषांगिक खर्चाबाबत प्राप्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबतची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. शासकीय इमारतीच्या बांधकामास मंजूरी देणेसंदर्भातील सचिव समितीची दिनांक १२.१२.२०१९ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपरोक्त पत्र दिनांक १९.१२.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहे. सदर बैठकीच्या इतिवृत्तानुसार शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती बांधकामासाठी नियुक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (पीएमसी) कंपनीस अदा करावयाचे सल्लागार शुल्क व इतर अनुषांगिक बाबींचे रुपये २८,४२,११,१९१ ( अठ्ठावीस कोटी, बेचाळीस लक्ष, अकरा हजार, एकशे एक्याण्णव फक्त) रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | शुल्क |
|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, बारामती यांना २३ एकर भूसंपदानापोटी अदा करावयाची रक्कम | २,३५,३२,८०० |
| २ | कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, बारामती यांना अदा करावयाचा कामगार कल्याण सेस | १,२६,२७,९१० |
| ३ | कार्यकारी अभियंता, औद्योगिक महामंडळ बारामती यांना पाणीपुरवठा सेवेसाठी अदा करावयाची रक्कम | १,७५,४१७ |
| ४ | मुख्य अग्निशामक अधिकारी यांना तात्पुरते अग्नि (फायर) ना हरकत प्रमाणपत्रससाठी अदा करावयाची रक्कम | १,१०,५५,१५५ |
| ५ | राज्य स्तर पर्यावरण समितीस पर्यावरण ना हरकत प्रमाणपत्रासाठी अदा करावयाची रक्कम | ५,००,००० |
| ६ | MPPCB स्थापन करण्यास प्राप्त मान्यतेस अनुसरून अदा करावयाची रक्कम | १०,००,००० |
| ७ | HT लाईन परिसरातील इलेक्ट्रो मॅग्नेटीक फिल्ड संबंधिच्या सर्व्हे व अभ्यासासाठी समीर, आयआयटी पवई यांना अदा करावयाची रक्कम | १,६८,५४० |
| ८ | गृह रजिस्ट्रेशन ॲण्ड रेंटीग फीस टू असोशिएशन फॉर डेव्हलपमेंट ॲण्ड रिसर्च ऑफ सस्टेनेबल हॅबिटेटस, नवी दिल्ली | ६,७६,३६९ |
| ९ | विद्युत पुरवठा मंजुरीसाठी विद्युत महामंडळास अदा करावयाची रक्कम | ४,००,००० |

| अ.क्र. | बाब | शुल्क |
|---|---|---|
| १० | पाणीपुरवठासाठी कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, बारामती यांना अदा करावयाची रक्कम | ५,७५,००० |
| ११ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयाच्या बांधकामासाठी नेमलेल्या स्टॅनटेक कन्सलटिंग इजिननियरिंग, प्रा.लि. यांना या कंपनीस प्रकल्प संकल्पना ते प्रकल्पाचे काम (टर्न की बेसीस ) या कामासाठी अदा करावयाची रक्कम (रुपये ५०० कोटी वर @ ४.६७ ) | २३,३५,००,००० |
| | एकूण | २८,४२,११,१९१ |

सदर विषयीचा उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दती व प्रचालित शासन निर्णयानुसार करण्याची जवाबदारी संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागची राहील.

४. सदर विषयी उपरोक्त बाबींवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीषाअंतर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ नुसार वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उप विभाग-५ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४(१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१/इमा-३, दिनांक ०८/०१/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीच्या तसेच शासकीय इमारतीच्या बांधकामास मंजूरी देणेबाबतच्या सचिव समितीच्या दिनांक १२.१२.२०१९ रोजी झालेल्या बैठकीच्या अनुषंगाने निर्गमित इतिवृत्तातील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०९१०४२०४३०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHARRAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.09 10:38:35 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव(वित्त) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) उप सचिव (इमारत) सार्वजनिक बांधकाम विभागमंत्रालय, मुंबई.
७) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,पुणे
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व विभाग) पुणे
११) अधिष्ठाता,शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) निवडनस्ती (प्रशा-१).